

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**दालन क्र. ४३९, चौथा मजला, विस्तार इमारत,मादाम कामा मार्ग,**
**हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**

Email ID: tnt1.sesd-mh@nic.in

---

क्रमांक : न्यायाप्र-२०२०/प्र.क्र.३२५/टीएनटी-१ दिनांक : १७ डिसेंबर, २०२१

**विषयः** माध्यमिक शाळेतून उच्च माध्यमिक शाळेतील बदलीस मान्यता देण्याबाबत

**संदर्भ**: शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांचे पत्र
क्र. एचएससी/४३७/२०१९, दिनांक १५.१.२०२०

**शासन ज्ञापन :-**

अकोला एज्युकेशन सोसायटी संचालित जिजाऊ कन्या विद्यालय, अकोला या माध्यमिक शाळेत १००% अनुदानित असलेल्या सहा. शिक्षक या पदावर श्रीमती रसिका पातुरकर या दिनांक १.७.२०१६ पासून तसेच श्री. उदय सुधाकरराव कोल्हेकर हे अकोला एज्युकेशन सोसायटी संचलित न्यू इंग्लिश हायस्कूल येथे १००% अनुदानित सहा. शिक्षक पदावर दिनांक २९.८.२००८ पासून कार्यरत आहेत. सदर शिक्षण संस्थेने, श्रीमती पातूरकर व श्री. कोल्हेकर यांची त्याच संस्थेंतर्गत न्यू इंग्लिश कनिष्ठ महाविद्यालय, अकोला येथे १००% अनुदानित पदावर बदली करून सदर बदलीस मान्यता देण्याचा प्रस्ताव शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांना सादर केला. तथापि, सदर बदलीबाबत निर्णय न झाल्याने श्रीमती पातुरकर व श्री. कोल्हेकर यांनी मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे रिट याचिका क्र. ७०३०/२०१९ दाखल केली. मा. उच्च न्यायालयाने दिनांक ५.११.२०१९ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने सदर प्रकरणी मार्गदर्शन देण्याची विनंती संदर्भाधीन दिनांक १५.१.२०२० च्या पत्रान्वये शासनास केली आहे.

२. महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील नियम- ४१ (५) अन्वये माध्यमिक शाळेतून कनिष्ठ अध्यापक महाविद्यालयात किंवा उलट, अशा प्रकारे शिक्षकांच्या बदलीबाबत तरतूद आहे. तथापि, सदर नियमात माध्यमिक शाळेतून उच्च माध्यमिक शाळेतील किंवा उलट, अशा प्रकारे शिक्षकांच्या बदलीबाबत स्पष्ट तरतूद नाही.

३. शासन निर्णय दिनांक २२.२.२०१९ नुसार अध्यापक विद्यालयातील पदव्युत्तर पदवी व बी. एड. अर्हता धारक शिक्षक तसेच उच्च माध्यमिक / कनिष्ठ महाविद्यालयातील पदव्युत्तर पदवी व बी. एड. अर्हताधारक शिक्षकांचा समावेश S-१६ या गटात होतो व वेतनश्रेणी रू. ४४९००-१४२४००/- अशी आहे.

४. श्रेणीनुसार, शाळांची चढती मांडणी ही प्राथमिक → उच्च प्राथमिक → माध्यमिक → उच्च माध्यमिक/ अध्यापक महाविद्यालय अशी आहे. प्राथमिक वरून माध्यमिक शाळेत, आणि माध्यमिक शाळेतील शिक्षक ते उ. मा. वि. (J. C.)/ कनिष्ठ अध्यापक महाविद्यालयातील शिक्षकांची बदली भिन्न पदांवरील आहे. तसेच त्यांच्या वेतनश्रेणीमध्ये देखील तफ़ावत आहे. तथापि, महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील नियम ४१ (५) अन्वये माध्यमिक शाळेतून अध्यापक महाविद्यालयात अथवा अध्यापक महाविद्यालयातून माध्यमिक शाळेत शिक्षक कर्मचा-यांची बदली अनुज्ञेय आहे. शिवाय वेतनश्रेणीचा विचार

करता उच्च माध्यमिक/ कनिष्ठ महाविद्यालय व अध्यापक महाविद्यालयातील शिक्षकांचे वेतन समकक्ष आहे. पर्यायाने उच्च माध्यमिक विद्यालयातील शिक्षक व कनिष्ठ अध्यापक महाविद्यालयातील शिक्षक ही समकक्ष पदे ठरतात. याच न्यायाने माध्यमिक शाळेतील शिक्षकांची उच्च माध्यमिक शाळेतील बदली देखील अनुज्ञेय ठरते.

५. उपरोक्त बाबी विचारात घेता, मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांनी रिट याचिका क्र. ७०३०/२०१९ प्रकरणी दिनांक ५.११.२०१९ रोजी दिलेले आदेश तसेच, महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील नियम ४१ (५) मध्ये नमूद इतर सर्वसाधारण अटी- शर्तींच्या अनुषंगाने विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांनी श्रीमती रसिका पातुरकर व श्री. उदय कोल्हेकर यांच्या बदलीस मान्यता तसेच उच्च माध्यमिक शिक्षक म्हणून सातव्या वेतन आयोगानुसार देय असणारी वेतनश्रेणी देण्याची कार्यवाही करावी.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२११२१७१६२३१३३८२१ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, pseudonym=8A56BA47E80DB19230A0A19F1AC94146E6B7B8A8, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2021.12.17 16:24:32 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतः**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे
३. शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे
४. विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती.